**वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत वीज दर सवलत योजनेत सुरू असलेले गैरप्रकार थांबविण्यासाठी उपाय योजना करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: धोरण २०१८/प्र.क्र.१६४९/टेक्स-५**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक - २२ ऑक्टोबर, २०२१.**

वाचा-

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक: धोरण २०१७/प्र.क्र.६/ टेक्स-५, दि. १५ फेब्रुवारी, २०१८.
२. शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक: संकिर्ण २०१५/प्र.क्र.१७५/उर्जा-५ दि. ७ नोव्हेंबर, २०१५.
३. दिनांक ३०.१०.२०१८ रोजी अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय यांच्यासोबत झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
४. शासन निर्णय, क्रमांक: धोरण २०१८/प्र.क्र.१६४९/टेक्स-५ दि.२१/१२/२०१८
५. शासन निर्णय, क्रमांक: धोरण २०१८/प्र.क्र.१६४९/टेक्स-५ दि.१३/०९/२०१९
६. शासन निर्णय, क्रमांक: धोरण २०१८/प्र.क्र.१६४९/टेक्स-५ दि.१५/०२/२०२१
७. शासन निर्णय, क्रमांक: धोरण २०१८/प्र.क्र.१६४९/टेक्स-५ दि.१३/०८/२०२१
८. शासन पत्र क्रमांक क्रमांक. संकिर्ण २०२१/प्र.क्र.१८३/टे-५ दि. २४/०९/२०२०
९. आयुक्त वस्त्रोद्योग यांचे पत्र क्रमांक जा.क्र.कार्या., ६(८)/सुत./वस्त्रो.धो.२०१८-२३/वीज सव./२०२१ दि.३१/०८/२०२१

**प्रस्तावना :**

संदर्भांकित क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये राज्याचे वस्त्रोद्योग धोरण जाहीर करण्यात आले आहे. या धोरणा अंतर्गत वस्त्रोद्योग प्रकल्पांना वीजदरात सवलत जाहीर करण्यात आली आहे. धोरणात जाहीर केल्यानुसार संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णयांन्वये वस्त्रोद्योग प्रकल्पांना वीज सवलत लागू करण्यात आली आहे. या शासन निर्णयात दिलेल्या निर्देशानुसार वस्त्रोद्योग प्रकल्पांनी स्व-घोषनापत्र शासनास सादर करणे गरजेचे आहे. परंतु वारंवार सुचना देऊन देखील काही प्रकल्पांनी स्व-घोषनापत्र तसेच या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ठातील प्रमाणपत्रे शासनास सादर केलेले नाहीत.

शासनाकडे प्राप्त तक्रारींमध्ये तसेच दक्षता व नियंत्रण पथकाच्या तपासणीत बहुतांश वस्त्रोद्योग प्रकल्पांमध्ये अनियमितता आढळून आली आहे तसेच काही वस्त्रोद्योग प्रकल्पात गैरव्यवहार झालेला शासनाच्या निदर्शनास आला आहे. त्याचप्रमाणे राज्यात वस्त्रोद्योगाच्या नावाखाली अन्य उद्योग वस्त्रोद्योगाच्या वीज सवलतीचा लाभ घेत असल्याच्या अनेक तक्रारी शासनास प्राप्त झालेल्या आहेत. अशा परीस्थीत शासनाच्या निधीचा गैरवापर टाळणे अत्यंत गरजेचे आहे.

सद्यस्थीतीत कोविड-१९ मुळे राज्याच्या महसुलाची अवस्था बिकट आहे. राज्यावर चक्रीवादळ, अकाळी पाऊस अशा अनेक समस्या आलेल्या आहेत अशा परीस्थीतीत देखील शासनाकडून वस्त्रोद्योगांना वीज अनुदान देणे सुरू आहे. परंतु शासनाच्या अनुदानाचा जर काही उद्योग अशा प्रकारे गैरवापर करत असतील तर त्यावर कडक शास्ती लावणे शासनाची जबाबदारी आहे. हे विचारात घेऊन वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत वीजदर सवलत योजनेत अनुदान घेत असलेल्या वस्त्रोद्योग प्रकल्पांची सखोल तपासणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेतील माहिती विचारात घेता वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत वीज अनुदान योजनेचा लाभ घेत असलेले वस्त्रोद्योग २७ अश्वशक्तीपेक्षा कमी जोडभार असलेले यंत्रमाग सोडून अन्य सर्व वस्त्रोद्योग प्रकल्प ज्यांची वीज सवलत सुरू आहे. त्याचप्रमाणे वीज सवलतीचा लाभ घेण्यासाठी नोंदणी करीत असलेले वस्त्रोद्योग प्रकल्प या सर्व प्रकल्पांनी खालील प्रमाणे कार्यवाही करावी.

१) ज्या उद्योगांची वीज सवलत सूरू असेल किंवा बंद आहे, अथवा वीज सवलत मागणीसाठी प्रस्ताव सादर करीत आहे त्या उद्योगांनी या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ठा नुसार प्रस्ताव आयुक्त (वस्त्रोद्योग), यांच्या संकेतस्थळावर ऑनलाईन सादर करावा.

२) सदर प्रस्तावात मागील ६ महिन्यांचे वीज देयक तसेच प्रकल्पाचा एकुण वीज वापर जसे औद्योगीक, कामगार वसाहत, त्यांचे कार्यालय व अन्य वापर यांच्या माहिती तसेच त्यासाठीच्या वापराचे वीज मिटर याची माहिती देखील सादर करावी.

२. ज्या प्रकल्पांची वीज सवलत नियमीत सुरू आहे त्या प्रकल्पांना वरील प्रमाणे प्रस्ताव सादर करण्यासाठी १० दिवसांची मुदत देण्यात येत आहे. या मुदतीत ज्या प्रकल्पांचे प्रस्ताव प्राप्त होणार नाहीत त्यांची वीज सवलत बंद करण्यात येईल. तसेच सदर प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर त्या प्रस्तावाची सखोल तपासणी केल्यानंतर शासनाच्या मान्यतेने सदर प्रकल्पांना वीज लागू करण्यात येईल.

३. या शासन निर्णयात दिलेल्या सुचनानुसार शासनास प्राप्त होणा-या वीज सवलतीच्या प्रस्तावात प्रकल्पांनी सादर केलेली माहिती तसेच प्रकल्पात प्रत्यक्षात असलेली माहिती तीच आहे किंवा कसे याची विभागाच्या दक्षता व नियंत्रण पथकाकडून नियमित तपासणी करण्यात येईल. जर पथकाच्या तपासणीत निदर्शनास आले की, प्रकल्पाने सादर केलेली माहिती तसेच प्रत्यक्षात असलेली माहिती यामध्ये तफावत

आहे, किंवा प्रकल्पाने चुकिची अथवा खोटी माहिती सादर केली आहे तर त्या प्रकल्पाची वीज सवलत तसेच अन्य सवलती तात्काळ बंद करण्यात येतील. तसेच यापुर्वी दिलेल्या सर्व अनुदानांची व्याजासह वसुली करण्यात येईल.

४. या शासन निर्णयात दिलेल्या सुचनानुसार वस्त्रोद्योग प्रकल्पांना प्रस्ताव सादर करण्यासाठी आयुक्त (वस्त्रोद्योग), यांनी त्यांच्या संकेतस्थळावर तरतूद करावी. तसेच आयुक्त (वस्त्रोद्योग), यांनी वस्त्रोद्योग प्रकल्पांचे प्रस्ताव त्यांना प्राप्त झाल्यानंतर शासनाच्या संदर्भ क्रमांक ८ येथील पत्रात दिलेल्या सुचना नुसार प्राप्त होणारे प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावेत. त्याचप्रमाणे या शासन निर्णयात दिलेल्या सुचना नुसार ज्या प्रकल्पांचे प्रस्ताव विहित मुदतीत प्राप्त होणार नाहीत किंवा प्राप्त झालेले प्रस्ताव शासनाने अमान्य केल्यास त्यांची वीज सवलत बंद करण्याच्या सुचना महावितरण कंपनीस देण्यात याव्यात व याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास नियमित सादर करावा.

५. ज्या प्रकल्पांनी या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ठाप्रमाणे यापुर्वी प्रस्ताव सादर केलेले आहेत. त्या प्रकल्पांनी पुन्हा प्रस्ताव सादर करण्याची आवश्यकता नाही. तसेच ज्या प्रकल्पांची वीज सवलत स्व-घोषनापत्र न सादर केल्यामुळे बंद आहे व त्यांनी प्रस्ताव सादर केलेले नाहीत त्यांनी देखील त्वरीत प्रस्ताव सादर करावे.

६. या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचना तात्काळ अंमलात येत आहेत. सबब वस्त्रोद्योग प्रकल्पांनी या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ठानुसार प्रस्ताव आयुक्त (वस्त्रोद्योग), यांच्या संकेतस्थळावर ऑनलाईन सादर कारावेत. प्रस्तावात सादर केलेली माहिती जबाबदारी वस्त्रोद्योग प्रकल्पाची राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२२१२३४११७८०२ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vmadane

**( विशाल मदने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
५. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
६. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य

८. सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
९. प्राधान सचिव (वस्त्रोद्योग), मंत्रालय, मुंबई.
१०. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महावितरण कंपनी, मुंबई ४०००५१.
११. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, कार्यासन-उर्जा-५ / ऊर्जा-३
१३. अवर सचिव / कार्यासन अधिकारी, कार्यासन टेक्स-१अ/टेक्स-१ब/टेक्स-२/टेक्स-३/टेक्स-४ /रेशीम कक्ष
१४. निवड नस्ती (कार्यासन टेक्स-५)

**शासन निर्णय, क्रमांक: धोरण २०१८/प्र.क्र.१६४९/टेक्स-५ दि.२२/१०/२०२१ सोबतचे परिशिष्ठ वीज सवलत प्रस्तावासोबत जोडायची माहिती / प्रमाणपत्रे खालील प्रमाणे आहे:-**

१) प्रकल्पाचे मागील ६ महिन्यांचे वीज देयक
   - प्रस्ताव सादर करण्यापुर्वी प्राप्त असेलेले शेवटचे ६ महीन्याचे वीज देयके

२) प्रकल्पात वस्त्रोद्योगासह अन्य कुठले उत्पादन होते किंवा कसे त्याची सखोल माहिती.
   - ज्या वीज मिटर मधून संपुर्ण प्रकल्पात वीज पुरवठा होतो, त्या वीज मिटर अंतर्गत अन्य उत्पादन होत असल्याची माहिती किंवा प्रकल्पात फक्त वस्त्रोद्योगाचे उत्पादन होत असल्यास त्याची संपुर्ण माहिती.

३) प्रकल्प उत्पादनात आहे याची तपासणी करण्यासाठी नजीकचे खरेदी विक्री देयक.
   - प्रकल्पात उत्पादन नियमित सुरू असल्यास उत्पादीत मालाची खरेदी विक्री होते त्या खरेदी विक्री व्यवहाराची प्रत

४) प्रकल्प NPA झाला नसल्याची खात्री करणेसाठी त्यासाठीचे बँकेचे प्रमाणपत्र.
   - प्रकल्पाने बँकेकडून घेऊन उभारणी केलेली असेल तर ज्या बँकेकडून कर्ज घेऊन उभारणी केलेली आहे त्या बँकेचे NPA प्रमाणपत्र किंवा जर प्रकल्प स्व-अर्थसहाय्याने उभारला गेला असल्यास ज्या बँकेत प्रकल्पाचे चालू खाते असेल त्यां बँकेचे NPA प्रमाणपत्र.

५) **Machinery Certificate** - प्रकल्पात उत्पादनासाठी असलेली सर्व यंत्रसामुग्रीची माहीती खालील प्रमाणे प्रमाणपत्रात उपलब्ध करून द्यावी.

## Machinery Certificate Format

## On Letter Head of Bank or Chartered Accountant or Chartered Engineer (Any of these)

To,

Secretory, (Textile),
Co-operation marketing and
Textile Department.
Government of Maharashtra
Mantralaya Mumbai-032

| Sr. No. | Name of Machines | Machine Model Number | Machine Serial Number | Purchase Invoice Number | Tufs eligibility GR Date & para no. | Price |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | xyx | | | | | |
| २. | xyx | | | | | |
| ३. | xyx | | | | | |
| ४. | xyx | | | | | |
| ५. | xyx | | | | | |
| ६. | Total | | | | | |

**I hereby certify that, the above information is factual and correct.**

Name, Designation, Seal & Signature

Date

Place